**विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, नाशिक येथील वर्ग-४ व वर्ग-२ चे कर्मचारी निवासस्थान दुरुस्ती बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय, क्रमांकः प्रशामा २०२५/प्र.क्र.३४/आरोग्य ३

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १३ फेब्रुवारी, २०२५.

**वाचा :**

**सहसंचालक आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर) मुंबई यांचे पत्र क्रमांक : आआसे/कक्ष-३ /टे.६/विसंसेरुनाशिकनिवादुरुस्ती/१४१५५-५६/२४, दिनांक २६/०९/२०२४.**

**प्रस्तावना :**

विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, नाशिक येथील वर्ग-४ व वर्ग-२ चे कर्मचारी निवासस्थान दुरुस्ती बांधकामाचे रु. ८७५.५८ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, नाशिक येथील वर्ग-४ व वर्ग-२ चे कर्मचारी निवासस्थान दुरुस्ती बांधकामाचे अंदाजपत्रक सन २०२२-२३ च्या दरसूचीवर आधारित आहे. सदर अंदाजपत्रक कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक यांनी तयार केले आहेत. तसेच कार्यकारी अभियंता, नाशिक विद्युत विभाग (सा.बा.वि.) नाशिक, अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक; मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक, व वैद्यकीय अधिक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय नाशिक, उपसंचालक आरोग्य सेवा नाशिक मंडळ, नाशिक यांनी प्रमाणित केले आहे. त्यानुसार एकुण रु. ८७५.५८ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास सोबत जोडण्यात आलेल्या Recapitulation sheet प्रमाणे खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२) अटी व शर्ती :-

१) इमारतीचे आराखडे हे सार्वजनिक बांधकाम विभाग/शासकीय इमारतीच्या अनुज्ञेय मानकास अनुसरुन असण्याची खातरजमा करावी. अशा नकाशांना व वास्तुमांडणी आराखडयास शासनाचे वास्तुशास्त्रज्ञ यांची मान्यता घेण्यात यावी.

२) इमारत बांधकाम करण्यापूर्वी विदयुतीकरणाच्या कामासाठी मुख्य अभियंता (विदयुत) व स्थापत्यांच्या कामासाठी मुख्य अभियंता (स्थापत्य) यांची तांत्रिक मंजुर घेण्यात यावी.

३) कामासाठी निविदा मागविण्यापूर्वी सदर कामास मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.

४) बांधकामासाठी उपलब्ध होणाऱ्या नियतव्ययामधून सदर कामास निधी उपलब्ध करुन देण्याच्या अटीच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

५) सदर कामाची ई-निविदा करतांना कामाचे तुकडे न करता एकत्रित निविदा करण्यात यावी.

६) कामासाठीच्या जागेची उपलब्धता, योग्यता व जागा पुरेशी आहे किंवा नाही याबाबतची खात्री संबंधित आरोग्य संस्था प्रमुखांनी करावी.

७) क्षेत्रिय जागेच्या परिस्थितीनुसार व आरोग्य संस्थांच्या आवश्यकतेनुसार प्रस्तावित कामाच्या किंमतीमध्ये अनावश्यक वाढ करण्यात येवू नये.

८) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने, या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता ही सार्वजनिक बांधकाम खात्याच्या त्यात्या-क्षेत्राच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून करण्यात येईल.

९) स्थानिक ग्रामीण नगर विकास संस्थेच्या संबंधित नियमानुसार बांधकाम परवानगी तसेच भोगवटा प्रमाणपत्र मिळविण्याची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभाग यांची राहील.

१०) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/तां.क.१ दि. १० जानेवारी,२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

११) केंद्र शासनाकडून निर्गमित IPHS च्या २०२२ च्या मार्गदर्शक सुनचांनुसार अंदाजपत्रकामध्ये सुधारणा समाविष्ट करुन प्रशासकीय मान्यतेच्या किंमतीच्या मर्यादेत राहून इमारतीचे बांधकाम करण्यात यावे.

१२) प्रस्तावित करण्यात आलेल्या इमारतीचे जोते क्षेत्रफळ व शासकीय इमारती यांच्या अनुज्ञेय मानकाप्रमाणे असल्याची खातरजमा करण्यात यावी.

१३) क्षेत्रियस्तरावर सदर बांधकामाचा संबंधित उपसंचालक आरोग्य सेवा व जिल्हा शल्य चिकित्सक यांनी वेळोवेळी आढावा घ्यावा.

१४) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र.बीडीजी२०१७/प्र.क्र.६०/इमा-२, दि.०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करावी.

१५) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुनच सदर कामाच्या निविदा सुचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

३. उपरोक्त १ ते १५ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग व जिल्हा शल्य चिकित्सक यांची राहील.

४. सदर बांधकामावरील खर्च मागणी क्रमांक- एच-८, मुख्यलेखाशिर्ष "४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१- नागरी आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय्य),११०- रुग्णालये व दवाखाने, (१)(अ)- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-इमारती, (००)(०१)-मोठी बांधकामे (४२१० ००१४), ५३-मोठी बांधकामे" याखाली भागविण्यात येईल.

५. विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, नाशिक येथील वर्ग-४ व वर्ग-२ चे कर्मचारी निवासस्थान दुरुस्ती बांधकामासाठी लागणाऱ्या रकमेची अर्थसंकल्पात तरतूद करण्याचा प्रस्ताव आयुक्त, आरोग्य सेवा, मुंबई यांनी त्वरीत शासनास सादर करावा.

६. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक १ येथील परिच्छेद क्र.१३४ अनुसार तसेच शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम,भाग-२, दि.२०.०९.२०१९ मधील भाग-१ उपविभाग-पाच, परिच्छेद क्र. १३४(१), १३४(२) आणि १३४(३) नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२१३१७३००४८८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY DATTARAM MAHADESHWAR

Digitally signed by SANJAY DATTARAM MAHADESHWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=759d43d3ca03f08520a6d49169531e74206cd390898bbe0690fead8f00f6a3eb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=09A8917EDE715503310B61D8A24357A945B188F3A254ABA25AC8365BB66E4EE8, cn=SANJAY DATTARAM MAHADESHWAR
Date: 2025.02.13 17:32:30 +05'30'

**( संजय द. महाडेश्वर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
३. संनियंत्रक तथा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक.
४. सह संचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये), मुंबई.
५. उप संचालक, आरोग्य सेवा नाशिक मंडळ, नाशिक.
६. वैद्यकीय अधिक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, नाशिक.

७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक.

८. जिल्हा कोषागार अधिकारी, जि. नाशिक.

९. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.

१०. अवर सचिव (अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

११. निवडनस्ती (आरोग्य-३).

**NAME OF WORK :-**

**Repairs to Residential Quarters at Regional Referral Hospital, Nashik , Tal. & Dist. Nashik**

## RECAPITULATION SHEET

| | | | | |
|---|---|---|---|---|
| 24 qrtr. | Sub Estimate No. 1 :- Re. Type - 4A,4B,4C | | ₹ | 2,54,11,790.00 |
| 32 qrtr. | Sub Estimate No. 2 :- Re. Type - 2A,2B | | ₹ | 1,94,57,147.00 |
| 24 qrtr. | Sub Estimate No. 3 :- Re. Type - Hivtap | | ₹ | 1,44,73,046.00 |
| 80 | Internal Electrification — Area 8895.00, Aprox. Rate 1455 ₹/sq.m. | | ₹ | 12942225 |
| | | (A) | ₹ | 5,93,41,983.00 |
| | Add for Lab Testing Charges | | ₹ | 51,215.00 |
| | Add for Royalty Charges | | ₹ | 43,257.62 |
| | | (B) | ₹ | 94,472.62 |
| | | (A+B) | ₹ | 5,94,36,455.62 (72378680.60) |
| | Add for GST on (A) | 18% | ₹ | ~~1,06,81,557.00~~ 130111157.44 |
| | Add for Labour Insurance on (A) | 1.0% | ₹ | ~~5,93,419.83~~ 722842.08 |
| | Add for Contingencies on (A) | 2.0% | ₹ | ~~11,86,839.66~~ 1445684.16 |
| | Total | | ₹ | ~~7,18,98,272.11~~ 8,75,58,365/- |
| | **Say** | | ₹ | ~~**7,18,98,272.00**~~ |

Sub Divisional Engineer
South Sub Division
Nashik

Executive Engineer
P.W. Division
Nashik

**Executive Engineer**
**Nashik Electrical Division P.W.D.**
**NASHIK**

**Superintending Engineer**
**P. W. Circle, Nashik.**

Technically Approved"

**Medical Superintendent**
**Regional Referral Hospital**
**Nashik.**

**Chief Engineer**
**P.W. Region, Nashik**

**Dy. Director of Health Services**
**Nashik Circle Nashik**